निवृत्तिवेतन/ कुटूंब निवृत्तिवेतनावरील
महागाई वाढ.
थकबाकीच्या रकमा प्रदान करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निमवा १००३/२१०/सेवा-४,**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,**
**दिनांकः १६ ऑक्टोबर २००३**

**निर्णय**

राज्य शासकीय निवृत्तिवेतनधारक/कुटुंबनिवृत्तिवेतनधारकांना शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः निमवा १००३/१२६/सेवा ४, दिनांक १४ ऑगस्ट २००३ अन्वये १ ऑगस्ट २००३ पासून केंद्रशासनाच्या सुत्रानूसार दरमहा मूळ निवृत्तिवेतन/कुटुंबनिवृत्तिवेतनावर ५५% या दराने महागाई वाढ मंजूर करण्यात आलेली आहे. राज्य शासकीय निवृत्तिवेतनधारक / कुटुंबनिवृत्तिवेतनधारकांना १ ऑगस्ट २००३ पूर्वीच्या कालावधीची निवृत्तिवेतन / कुटुंबनिवृत्तिवेतनावरील महागाई वाढीची थकबाकी मंजूर करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. शासन असा आदेश देत आहे की, राज्य शासकीय निवृत्तिवेतनधारक / कुटूंब निवृत्तिवेतनधारक यांना त्यांच्या मूळ निवृत्तिवेतन / कुटूंब निवृत्तिवेतनावर खालील तक्त्यात दर्शविलेल्या सुधारित दराने महागाई वाढीच्या थकबाकीच्या रकमा मंजूर करण्यात याव्यात. :-

| अ.क्र. | कालावधी | महागाई वाढीचा मासिक दर (टक्के) | |
|---|---|---|---|
| | | विद्यमान | सुधारित |
| १ | १ जानेवारी २००२ ते ३१ मार्च २००२ पर्यंत (३महिने) | ४१.५ | ४३.५ |
| २ | १ एप्रिल २००२ ते ३० जून २००२ पर्यंत (३ महिने) | ४४.५ | ४६.२५ |
| ३ | १ जुलै २००२ ते ३१ डिसेंबर २००२ (६ महिने) | ४४.५ | ४८.५ |
| ४ | १ जानेवारी २००३ ते ३१ मार्च २००३ पर्यन्त (३ महिने) | ४४.५ | ५०.७५ |
| ५ | १ एप्रिल २००३ ते ३१ जुलै २००३ (४ महिने) | ४४.५ | ५५ |

२. शासन असाही आदेश देत आहे की, राज्य शासनाने यापूर्वी (i) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः सेनिवे १००२/ १/ सेवा-४, दिनांक १३ जानेवारी २००२ व (ii) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः निमवा १००२/१३६/सेवा-४, दिनाक १८ मे २००२ अन्वये अनुक्रमे ४१.५ % व ४४.५ % या दराने दिनांक १ ऑक्टोबर २००१ ते ३१मार्च२००२ व १ एप्रिल २००२ ते ३१ जुलै २००३ या कालावधीत मंजूर केलेल्या महागाई वाढीच्या

रकमा, आता वरील सुधारित दराने देय ठरणाऱ्या महागाई वाढींच्या रकमांशी समायोजित करण्यात याव्यात व उर्वरित अनुज्ञेय असलेली सुधारित दराच्या महागाई वाढीच्या थकबाकीची रक्कम अदा करण्यात यावी.

३. रुपयाच्या अपूर्णांकात असलेली महागाई वाढीची रक्कम पुढील रुपयात पूर्णांकित करावी.

४. प्रत्येक वैयक्तिक प्रकरणी देय होणाऱ्या महागाई वाढीच्या रकमेची परिगणना करण्याची जबाबदारी ही निवृत्तिवेतन संवितरण प्राधिकारी म्हणजे यथास्थिती, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/कोषागार अधिकारी यांची राहील.

५. शासन असाही आदेश देत आहे की, ज्यांना निवृत्तिवेतन योजना लागू केलेली आहे, अशा मान्यता व अनुदानप्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषि विद्यापीठे यांमधील निवृत्तिवेतनधारक/कुटुंब निवृत्तिवेतनधारक यांना वरील निर्णय, *योग्य त्या फेरफारांसह,* लागू राहील.

६. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक पाच) च्या कलम २४८ च्या परंतुकान्वये प्रदान केलेले अधिकार आणि त्यासंबंधातील इतर सर्व अधिकार यांचा वापर करुन शासन असाही आदेश देत आहे की, वरील निर्णय जिल्हा परिषदांचे निवृत्तिवेतनधारक/कुटुंब निवृत्तिवेतनधारक यांनाही लागू राहतील.

७. ज्या राज्य शासकीय कर्मचाऱ्यांनी सरकारी क्षेत्रातील उपक्रमांमध्ये/स्वायत्त संस्थांमध्ये/स्थानिक संस्था इत्यादींमध्ये स्वतःला सामावून घेतल्यानंतर एक रकमी ठोक रक्कम स्वीकारलेली आहे, व जे निवृत्तिवेतनाच्या १/३ इतका अंशराशीकृत भाग पुनःस्थापित करण्यासाठी तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-निअंक १०९९/३०६/सेवा-४, दिनांक १५ नोव्हेंबर १९९९ अनुसार अंशराशीकृत रकमेच्या सुधारणेस पात्र ठरले आहेत, अशा कर्मचाऱ्यांनाही, शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : निअंक १००१/५०/सेवा ४, दिनांक ९ एप्रिल २००१ च्या तरतुदीनूसार त्यांच्या पूर्ण निवृत्तिवेतनावर, वरील परिच्छेद-१ मध्ये विहित केलेल्या दिनांकापासून व विहित दराने निवृत्तिवेतनावरील महागाई वाढीची थकबाकी अनुज्ञेय राहील.

८. यासंबंधीचा खर्च वरील परिच्छेदात नमूद केलेल्या निवृत्तिवेतनधारकांची निवृत्तिवेतने ज्या अर्थसंकल्पीय शीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतात, त्या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या शीर्षांतर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

९. शासनाने वेळोवेळी मंजूर केलेल्या निवृत्तिवेतनावरील महागाई वाढी देण्याबाबतचे सध्या अस्तित्वात असलेले सर्व आदेश, *योग्य त्या फेरफारांसह*, आता मंजूर केलेल्या महागाई वाढीस देखील लागू राहतील.

१०. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वसन्त वा. चौधरी
शासनाचे उपसचिव.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई (१२५ प्रती),

महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर (१२५ प्रती),

महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई (५ प्रती),

महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर (५ प्रती),

संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई (५ प्रती),

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (२५ प्रती),

संचालक, माहिती व जलसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई, (५०० प्रती)

मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई (१० प्रती),

उप-मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती (प्रत्येकी १० प्रती),

वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक (प्रत्येकी १५ प्रती),

निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (प्रत्येकी १० प्रती),

राज्यपालांचे सचिव,

मुख्य मंत्र्यांचे सचिव,

उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,

सर्व मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,

*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,

*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,

*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण कुटीर क्र.३ व ४, अधिदान व लेखा कार्यालय आवार, मंत्रालयासमोर, मुंबई,

मंत्रालयातील सर्व विभाग,

विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,

मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,

सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती),

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

सर्व जिल्हा परिषदांचे अध्यक्ष (प्रत्येकी ५ प्रती),

सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी (प्रत्येकी २५ प्रती),

शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती),

तंत्र शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई (५ प्रती),

संचालक, महानगरपालिका प्रशासन, मुंबई (५ प्रती),

सर्व विभागीय शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

सर्व विभागीय तंत्र शिक्षण उप संचालक (प्रत्येकी ३ प्रती),

शिक्षण निरीक्षक, बृहन्मुंबई, दक्षिण/उत्तर/पश्चिम,

सर्व प्रशासन अधिकारी, नगरपालिका शिक्षण मंडळ (प्रत्येकी ५ प्रती),

सर्व महानगरपालिका व नगरपरिषदा, महाराष्ट्र राज्य (प्रत्येकी ५ प्रती),

सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण) (प्रत्येकी ५ प्रती),

कुल सचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जिल्हा अहमदनगर (१० प्रती),

कुल सचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ , परभणी (१० प्रती),

कुल सचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला (१० प्रती),

कुल सचिव, कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी (१० प्रती),

ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई (१२ प्रती),

शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),

उच्च व तंत्र शिक्षण आणि सेवायोजंन विभाग, मंत्रालय, मुंबई (२५ प्रती),

कृषि व पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स्य व्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई (१० प्रती),

वित्त विभागातील सर्व कार्यासने,

निवड नस्ती, कार्यासन सेवा-४.

---

***पत्राद्वारे.**

**Dearness Relief on pension/family pension**

**Payment of arrears**

# GOVERNMENT OF MAHARASHTRA

**Finance Department**

Government Resolution No.DRP-1003/210/ SER-4,
Mumbai 400 032, dated 16th October 2003.

## RESOLUTION

Government has sanctioned dearness relief to the State Government pensioners/family pensioners on their monthly basic pension/family pension as per the Central Government formula at the rate of 55 per cent with effect from 1st August 2003 vide Government Resolution, Finance Department, No. DRP-1003/126/SER-4, dated 14th August 2003. The question of payment of arrears of dearness relief to the State Government pensioners/family pensioners for the period prior to 1 August 2003 was under consideration of the Government. Government is pleased to decide that arrears of dearness relief shall be paid on the basic pension/family pension of State Government pensioners/family pensioners at the revised rates as indicated in the following table:-

| Sr.No. | Period | Rate of Dearness Relief per month (Per centage) | |
|---|---|---|---|
| | | Current | Revised |
| 1 | From 1st January 2002 to 31st March 2002 (3 Months) | 41.5 | 43.5 |
| 2 | From 1st April 2002 to 30th June 2002 (3 Months) | 44.5 | 46.25 |
| 3 | From 1st July 2002 to 31st December 2002 (6 Months) | 44.5 | 48.5 |
| 4 | From 1st January 2003 to 31st March 2003 (3 Months) | 44.5 | 50.75 |
| 5 | From 1st April 2003 to 31st July 2003 (4 Months) | 44.5 | 55 |

2. Government is also pleased to decide that the amounts of dearness relief on pension/family pension already sanctioned at the rate of 41.5 percent and 44.5 percent for the period from 1st October 2001 to 31st March 2002 and from 1st April 2002 to 31st July 2003 vide (i) Government Resolution, Finance Department No. PEN-1002/1/SER-4, dated 13th January 2002, and (ii) Government Resolution, Finance Department, No. DRP-1002/136/SER-4, dated 18th May 2002,

respectively, shall now be adjusted against the amount of arrears of dearness relief payable under the revised rates prescribed above and the rest of the amount of arrears admissible as per the aforesaid revised rates shall be paid.

3. Payment of dearness relief involving a fraction of a rupee shall be rounded of to the next higher rupee.

4. It will be the responsibility of the Pension Disbursing Authority, i.e. Pay and Accounts Officer, Mumbai/Treasury Officers, as the case may be, to calculate the quantum of dearness relief payable in each individual case.

5. Government is also pleased to direct that above decisions should, ***mutatis mutandis***, apply to those employees including family pensioners of Recognised and Aided Educational Institutions, Non-Agricultural Universities and affiliated Non-Government Colleges and Agricultural Universities to whom the pension scheme is made applicable.

6. In exercise of the powers conferred by the proviso to Section 248 of the Maharashtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah. V of 1962) and of all the other powers enabling it in that behalf, Government is further pleased to decide that the above decision apply to the pensioners including family pensioners of Zilla Parishads.

7. State Government Employees who had drawn lumpsum payment on absorption in a PSU/Autonomous body/Local Bodies and have become entitled to restoration of 1/3rd commuted portion of pension as well as revision of the restored amount in terms of Government Resolution, Finance Department, No.COP 1099/306/SER-4, dated 15th Novermber 1999 will also be entitled to the payment of arrears of dearness relief on full pension as per the provisions of Government Resolution, Finance Department, No. COP-1001/50/SER-4, dated 9 April 2001, at the prescribed rates and from the dates prescribed in paragraph 1 above.

8. The expenditure on this account should be debited to the Budget Heads to which the retirement benefits of the employees mentioned in the above paras are debited and should be met from the grants sanctioned thereunder.

9. All orders in force in regard to the payment of relief on pension sanctioned by Government from time to time will, ***mutatis mutandis***, apply to the dearness relief now sanctioned.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

**VASANT W.CHAUDHARI**
Deputy Secretary to Government